विभाग प्रमुख विद्युत अभियांत्रिकी, शासकीय तंत्रनिकेतन, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा गट-अ या पदावर नामनिर्देशनाने नियुक्तीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ससेनि-३२१६/प्र.क्र.१७४/१६/तांशि -७**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक:- २९ डिसेंबर,२०१६**

**संदर्भ :** १) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : एसआरव्ही-२०१५/ प्र.क्र.१५६/ कार्या.१२, दि.८ मे, २०१५.

२) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे क्र.१५ (१) (१६५)/५५१/सात-अ, दि. ०६ सप्टेंबर, २०१६ चे पत्र.

३) संचालक तंत्रशिक्षण संचालनालय महाराष्ट्र राज्य मुंबई यांचे क्र.४अ/आस्था/ २०१६/ १०३६,दि. २५ ऑक्टोबर, २०१६ चे पत्र.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संदर्भाधीन दि.०६ सप्टेंबर, २०१६ च्या पत्राद्वारे एकूण ०८ उमेदवारांची विभागप्रमुख, विद्युत अभियांत्रिकी, शासकीय तंत्रनिकेतन, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा, गट-अ या पदावर शिफारस केलेली आहे. त्यापैकी या पदावर महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत खालील उमेदवारांची त्यांच्या नावासमोर रकाना क्र. ०७ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी ते ज्या दिनांकास त्यांच्या पदाचा कार्यभार स्विकारतील त्या दिनांकापासून दोन वर्षाच्या परिविक्षा कालावधीसाठी स्थानापन्न नियुक्ती करण्यात येत आहे. सदर पदस्थापना महसूली विभाग वाटप नियम, २०१५ नुसार करण्यात आलेली आहे.

| अ. क्र. | आयोग पुरस्कृत उमेदवाराचे नांव | गुण. क्र. | वर्गवारी | आयोगाने शिफारस केलेला प्रवर्ग | दि.८/५/२०१५ अन्वये वाटप केलेला महसूली विभाग | नियुक्तीचे ठिकाण | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | श्री.लुलेकर दिलीप देविदास | ०१ | इ.मा.व. (NCL-NO ) | खुला-१ | नागपूर | शासकीय तंत्रनिकेतन, नागपूर | **वैद्यकीय तपासणी अहवाल व नाशिक येथील सन २००८ ते २०१३ वास्तव्याच्या कालावधीतील चारित्र्य पडताळणी व पूर्व चारित्र्य पडताळणी प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीस अधीन राहून.** |
| २ | श्री.भरतकर सचिन शामराव | ०२ | इ.मा.व. | इ.मा.व.-१ | अमरावती | शासकीय तंत्रनिकेतन, अमरावती | **वाशिम येथील त्यांच्या वास्तव्याच्या कालावधीतील चारित्र्य पडताळणी व पूर्व चारित्र्य पडताळणी प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीस अधीन राहून.** |

| अ. क्र. | आयोग पुरस्कृत उमेदवाराचे नांव | गुण. क्र. | वर्गवारी | आयोगाने शिफारस केलेला प्रवर्ग | दि.८/५/२०१५ अन्वये वाटप केलेला महसूली विभाग | नियुक्तीचे ठिकाण | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| ३ | श्री.शेळके राजेश उत्तम | ०३ | खुला | खुला (महिला) Against-१ | नाशिक | शासकीय तंत्रनिकेतन, नाशिक | **कोल्हापूर येथील त्यांच्या वास्तव्याच्या कालावधीतील चारित्र्य पडताळणी व पूर्व चारित्र्य पडताळणी प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीस अधीन राहून.** |
| ४ | श्री.सर्वज्ञ विलास विश्वनाथ | ०४ | खुला | खुला (महिला) Against-२ | नागपूर | शासकीय तंत्रनिकेतन, आर्वी | ----- |
| ५ | श्री.कुलकर्णी संतोष भालचंद्र | ०५ | खुला | खुला (खेळाडू) Against-१ | अमरावती | शासकीय तंत्रनिकेतन, वाशिम | ----- |
| ६ | श्री.सुरजुसे राजेश शंकरराव | ०७ | भ.ज.(ब) | भ.ज.(ब)-१ | नागपूर | शासकीय तंत्रनिकेतन, साकोली | **वैद्यकीय तपासणी अहवाल सादर करण्याच्या अटीस अधीन राहून.** |
| ७ | श्री.नाईक श्रीकांत मारुती | ०८ | वि.जा.(अ) | वि.जा.(अ)-१ | अमरावती | शासकीय तंत्रनिकेतन, खामगांव | **कोल्हापूर येथील त्यांच्या वास्तव्याच्या कालावधीतील चारित्र्य पडताळणी व पूर्व चारित्र्य पडताळणी प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीस अधीन राहून.** |

०२. गुणवत्ता क्रमांक ०१ व ०७ येथील उमेदवार वगळता उर्वरित उमेदवारांना वैदयकीय मंडळाने वैदयकीय दृष्टया शासकीय सेवेत पात्र ठरविले आहे तशी नोंद त्यांच्या सेवा पुस्तकात घेण्यात यावी. उपरोक्त गुणवत्ता क्रमांक ०१ व ०७ येथील ०२ उमेदवारांना महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती नियम) १९८१ मधील नियम ११ (१) अन्वये नियुक्ती होण्यापूर्वी किंवा नियुक्तीच्या तारखेपासून त्याची सहा महिन्याची सेवा पूर्ण होण्यापूर्वी, यापैकी जे अगोदर घडेल त्याप्रमाणे आरोग्याबद्दलचे वैद्यकीय प्रमाणपत्र दाखल करणे बंधनकारक राहील या अटीच्या अधिन राहून नियुक्ती देण्यात येत आहे. उपरोक्त गुणवत्ता क्रमांक ०१ व ०७ येथील ०२ उमेदवारांनी वैद्यकीय प्रमाणपत्र नियुक्तीच्या आदेशाच्या दिनांकापासून सहा महिन्याच्या आत सादर करावे अन्यथा सहा महिन्याच्या कालावधीनंतर सदर नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल.

०३. गुणवत्ता क्रमांक ०१, ०२, ०३ व ०८ येथील उमेदवारांनी सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.चापअ-१००८/प्र.क्र.२१४/०८/१६-अ, दि.०९ जानेवारी,२००९ नुसार चारित्र्य व पुर्व चारित्र्य पडताळणी प्रमाणपत्र नियुक्ती आदेशापासून सहा महिन्यांच्या आत सादर करणे आवश्यक आहे. जर सदर

प्रमाणपत्रे त्यांनी विहीत मुदतीत सादर केले नाही तर उक्त कालावधी संपताच त्यांची सदर पदावरील नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल. सदर उमेदवारांची नियुक्ती ही निव्वळ तात्पुरत्या स्वरूपाची असून त्यांच्या चारित्र्य पडताळणीचा अहवाल असमाधानकारक असल्याचे निर्दशनास आल्यास त्यांची नियुक्ती कोणतेही कारण न देता एक महिन्याची नोटीस देवून समाप्त करण्यात येईल. उर्वरीत उमेदवारांचे चारित्र्य पडताळणी अहवाल व साक्षांकन नमुना पोलीसांकडून प्राप्त झाला असून त्यांच्या विरूद्द कोणताही दंड व शिक्षा असलेबाबतची नोंद आढळून येत नसल्याचे कळविले आहे.

०४. गुणवत्ता क्रमांक ०५ येथील उमेदवार वगळता सर्व उमेदवारांना त्यांच्या पूर्वीच्या शासकीय सेवेतील मागील ५ वर्षाचे गोपनीय अहवाल (CR) सादर करण्याच्या अटीस अधिन राहून नियुक्ती करण्यात येत आहे. त्यांचे गोपनीय अहवालामध्ये प्रतिकूल शेरे आढळून आल्यास त्यांची नियुक्ती रद्द करण्यात येईल.

०५. उपरोक्त उमेदवाराची, विभाग प्रमुख विद्युत अभियांत्रिकी, शासकीय तंत्रनिकेतन, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा, गट-अ या पदावर ते प्रत्यक्ष हजर झाल्याच्या दिनांकापासून, नामनिर्देशनाने, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून नियुक्ती करण्यात येत आहे:-

१) सदर सर्व उमेदवारांची वेतनश्रेणी रु. ३७,४००-६७,०००/- या पे बँड व उच्च व तंत्रशिक्षण विभाग शासन निर्णय क्र. एसपीसी-२०१०/(३४/१०)/तांशि-२, दि. २०/०८/२०१० मध्ये नमुद एजीपी मध्ये राहील.

२) सदर वेतनश्रेणीव्यतिरिक्त शासन वेळोवेळी ठरवेल त्या दराने महागाई भत्ता, घरभाडे भत्ता व स्थानिक पूरक भत्ता अनुज्ञेय राहील.

३) सदर उमेदवारांचे प्रथम वेतनवाढ परिविक्षा कालावधीतील एक वर्ष पूर्ण झाल्यानंतर देण्यात येईल व त्यानंतरची वेतनवाढ परिविक्षा कालावधी समाधानकारकरीत्या पूर्ण केल्यानंतर मिळेल.

४) सदर उमेदवारांचे परिविक्षा कालावधीतील काम किंवा वर्तणूक अयोग्य, अपेक्षित दर्जाची नसल्यास अथवा असमाधानकारक आढळल्यास त्यांची सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल अथवा सेवेतून कमी करण्यास ते पात्र ठरतील.

५) सदर सर्व उमेदवारांची नियुक्ती सरळ सेवाप्रवेश नियुक्तीसाठी विहीत केलेल्या नियमाच्या अधीन राहून ते यापूर्वी हिंदी व मराठी भाषेच्या परीक्षा उत्तीर्ण झालेले नसल्यास किंवा त्या परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसल्यास त्या परीक्षा त्यांना विहीत मुदतीत उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. तसे न झाल्यास त्यांची वेतनवाढ रोखून ठेवण्यात येईल.

६) शिफारसपात्र मागासवर्गीय उमेदवाराचे जाती विषयक दावे संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याकडून / संबंधित प्राधिका-याकडून तपासून घेण्यात यावेत.

७) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.प्रशिक्षण२०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दि.७/८/२००१ अन्वये शासन सेवेतील नियुक्तीकरीता संगणक हाताळणी/वापराबाबतचे ज्ञान एक आवश्यक अर्हता म्हणून निश्चित करण्यात आली आहे. त्यानुसार शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/२००१/३९,दि.१९/३/२००३ अन्वये आवश्यक प्रमाणपत्र नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून दोन वर्षाच्या आत उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. जर त्यांनी विहीत मुदतीत प्रमाणपत्र उपलब्ध करुन दिले नाही तर उक्त कालावधी संपताच त्यांची सदर पदावरील सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येतील.

८) उपरोक्त उमेदवारांपैकी महाराष्ट्र शासनाच्या सेवेत कार्यरत असलेल्या उमेदवारांचे परिवीक्षाधीन काळातील वेतन महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ च्या नियम ११ नुसार निश्चित करून महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम १९८१ च्या नियम ३९.१ मधील पहिल्या परंतुकानुसार त्यांना परिविक्षाधीन काळात वेतनवाढ अनुज्ञेय राहील व त्यांचे नवीन पदावरील प्रारंभीक वेतन वित्त विभाग, शासन निर्णय क्र.वेतन-१२८९/प्र.क्र.२/९०/ सेवा-३, दि.२३ मार्च, १९९४ मधील तरतुदीनुसार संस्थास्तरावर निश्चित करण्यात यावे.

९) परिच्छेद-१ मध्ये नमूद केलेल्या उमेदवारांनी त्यांच्या नावासमोर निर्देशिलेल्या पदावर आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत तात्काळ रुजु व्हावे. सदर विहीत मुदतीत जर त्यांनी नियुक्ती स्विकारली नाही तर आयोगाने घेतलेल्या परीक्षेत त्यांनी मिळविलेल्या गुणवत्ताक्रमानुसार त्यांना अनुज्ञेय असलेली ज्येष्ठता मिळणार नाही शिवाय प्रस्तुत नियुक्तीच्या संदर्भात त्यांनी वरील मुदतीत शासनास काहीही कळविले नाही तर, कोणतीही पूर्वसूचना न देता त्यांच्या नियुक्तीचे सदरचे आदेश रद्द करण्यात येतील.

१०) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अंनियो-१००९/प्र.क्र.३२/सेवा-४, दि. १८/०८/२००९ मधील तरतुदीनुसार दि.१ नोव्हेंबर,२००५ पूर्वी शासन सेवेत निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेवर कार्यरत असलेल्या शासकीय कर्मचा-यांने त्याच किंवा अन्य विभागातील निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेच्या पदावरील नियुक्तीसाठी दि. १ नोव्हेंबर,२००५ पूर्वी किंवा त्यानंतर अर्ज केला असेल आणि त्याला दि. १ नोव्हेंबर, २००५ रोजी किंवा त्यानंतर नवीन पदावर नियुक्त करण्यात आले असेल तर अशा प्रकरणी शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: अंनियो-१००६/८७/सेवा-४, दि.१२ जानेवारी, २००७ मधील (i) ते (iv) येथे नमूद केलेल्य सर्व अटींची पूर्तता झाल्यास संबंधीत शासकीय कर्मचा-यास महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन), नियम,१९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू ठरतील. दि. १८/०८/२००९ च्या परिपत्रकात नमूद (i) ते (iv) येथील सर्व अटींची पूर्तता ज्या प्रकरणी होत नसेल, अशा शासकीय कर्मचा-यास नवीन राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना लागू ठरतील.

११) सदर उमेदवारांचे सेवानिवृत्तीचे वय प्रचलित नियमानुसार राहील.

१२) उमेदवारांस नियुक्तीच्या ठिकाणी उपस्थित राहण्यासाठी प्रवासभत्ता देण्यात येणार नाही. तथापी, वरील उमेदवारांपैकी, सध्या शासन सेवेत कार्यरत असलेल्या उमेदवारांना पदग्रहण कालावधी अनुज्ञेय राहील.

१३) सदर उमेदवारांनी नोकरी सोडण्यापूर्वी शासनास एक महिन्याची पूर्वसुचना देणे अथवा एक महिन्याचे वेतन देणे आवश्यक आहे.

०६. सदर नियुक्ती उमेदवारांनी सादर केलेल्या प्रमाणपत्रांच्या सत्यासत्यतेवर अवलंबुन राहील. सदर प्रमाणपत्र नियुक्तीनंतर खोटे अथवा बनावट आढळल्यास सदर उमेदवाराची नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल.

०७. हे आदेश प्राप्त होताच संबधित उमेदवारांनी नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व त्याबाबतचा अहवाल संबधित संस्थाप्रमुखाकडे सादर करावा. संस्थाप्रमुखांनी त्याबाबतचा अहवाल संचालकामार्फत शासनास सादर करावा.

०८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२३०१६०१०८२००८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhir Jaya Shetty

Digitally signed by Sudhir Jaya Shetty
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, serialNumber=e9d37d499a521b728aeb3dc8ec38b759420308b9fd7816002b4af0ffbf1111d7, cn=Sudhir Jaya Shetty
Date: 2016.12.30 16:03:34 +05'30'

**( सुधीर जया शेट्टी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**
सर्व संबंधित उमेदवार (नोंदणीकृत डाकेने) (e-mail द्वारे)

**प्रत,**

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राव्दारे).
२. संचालक, तंत्रशिक्षण, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. मा. मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.राज्यमंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
६. सहसंचालक तंत्र शिक्षण, विभागीय कार्यालय, नागपूर, अमरावती, नाशिक (तंत्र शिक्षण संचालनालयामार्फत).
७. प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन, सर्व संबंधित संस्था (तंत्र शिक्षण संचालनालयामार्फत).
(वरील उमेदवारांना रुजू करुन घेताना त्यांच्या शैक्षणीक तसेच इतर मूळ प्रमाणपत्रांची तपासणी करुन संस्थाप्रमुखांनी स्वत: खात्री करावी व सदर उमेदवारांना हजर करुन घ्यावे व त्याबाबतचा अहवाल संचालक, तंत्रशिक्षण, मुंबई यांच्यामार्फत शासनास तात्काळ सादर करावा. तसेच संबंधित संस्थाप्रमुखांनी या आदेशातील ज्या उमेदवारांची नियुक्ती अटीच्या अधिन राहुन केली आहे त्या उमेदवारांकडून विहीत मुदतीत या अटीची पुर्तता करुन घेवून त्याबाबतचा कार्यपूर्तता अहवाल संचालक, तंत्रशिक्षण यांच्यामार्फत शासनास तात्काळ सादर करावा.)
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व संबंधित जिल्हे (तंत्र शिक्षण संचालनालयामार्फत).
१०. निवड नस्ती (तांशि-७).